**बृहन्मुंबई महानगरपालिकेतील फाईल्स गहाळ झाल्या प्रकरणाची चौकशी करण्यासाठी चौकशी समिती नियुक्त करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीएमसी-१२१३/प्र.क्र.८७४/नवि-२१

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २० एप्रिल, २०१५

**संदर्भ :**

नगर विकास विभाग शासन निर्णय क्र. बीएमसी-१२१३/प्र.क्र.८७४/नवि-२१, दिनांक २४ सप्टेंबर, २०१३.

**प्रस्तावना :**

सन २०१३ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये मुंबई महानगरपालिकेच्या विविध विभागातून ६००० फाईल्स गहाळ झाल्याबाबत उपस्थित लक्षवेधी सूचनेवरील चर्चेच्या वेळी, याबाबत राज्य शासनाच्या अतिरिक्त मुख्य सचिव व सचिवांपेक्षा वरिष्ठ दर्जाचे अधिकारी अशा दोन अधिकाऱ्यांची ताबडतोब चौकशी समिती नियुक्त करण्याचे आदेश या ठिकाणी देत आहे असे तत्कालीन मा. मुख्यमंत्री महोदयांनी विधानमंडळात घोषित केले होते. त्यास अनुसरुन वरील संदर्भाधीन दिनांक २४.०९.२०१३ च्या शासन निर्णयान्वये, बृहन्मुंबई महानगरपालिकेतील फाईल्स गहाळ झाल्या प्रकरणाची चौकशी करण्यासाठी अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग व प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग यांची चौकशी समिती गठीत करण्यात आली होती. सदर चौकशी समितीमध्ये प्रशासकीय कारणास्तव सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

शासन आता याद्वारे, बृहन्मुंबई महानगरपालिकेतील फाईल्स गहाळ झाल्या प्रकरणाची चौकशी करण्यासाठी प्रधान सचिव, नियोजन विभाग व प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग यांची चौकशी समिती गठीत करीत आहे.

सदर समितीसाठी महानगरपालिकेच्या मुख्यालयामध्ये कार्यालय उपलब्ध करुन देणे व तद्अनुषंगिक सर्व सोयी सुविधा बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत पुरविण्यात याव्यात.

सदर समितीने त्यांचा अहवाल तीन महिन्यांच्या मुदतीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२२१५३३३१००२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Seema P Dhamdhere

Digitally signed by Seema P Dhamdhere
DN: CN = Seema P Dhamdhere, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Joint Secretary
Date: 2015.05.22 15:34:47 +05'30'

**(सीमा ढमढेरे)**
सह सचिव

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
४. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नवि १), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
९. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.कार्यासन नवि-२१, निवड नस्ती.